**रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयातील**
**रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी**
**गट-ब यांच्या बदल्या सन २०१५-१६**

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

शासन आदेश क्रमांक बदली-२०१५/प्र.क्र.१७/प्रशा-२
मुख्य इमारत, २ रा मजला, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २४ जून, २०१५.

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्योचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ या विभागातील खालील अधिकाऱ्यांच्या नियतकालीक/ प्रशासकीय कारणास्तव, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालयाचे नाव | बदलीनंतर पदस्थापना द्यावयाचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.दि.ग.राजे | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, सांगली | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, ठाणे | रिक्त पदी |
| २ | श्री.आ.बा.तांबोळी | विद्यापीठ रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, कोल्हापूर | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, ठाणे | रिक्त पदी |
| ३ | श्रीम.नि.प्र.औघड | आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, अचलपूर | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, बुलढाणा | रिक्त पदी |
| ४ | श्री.प्र.ग.हरडे | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, नागपूर | आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, चंद्रपूर | रिक्त पदी |
| ५ | श्रीम.ए.ए.सोवळे | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, भंडारा | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, नागपूर | रिक्त पदी |

२.	महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने या विभागातील खालील अधिकाऱ्याची त्याच्या विनंतीनुसार व सार्वजनिक सेवेच्या हितार्थ त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.२१०/१०/१२ दि. ०३.०६.२०११ मध्ये विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून बदली करण्यात येत आहे. सदर अटी व शर्तीची कटाक्षाने पालन करण्यात यावे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालयाचे नाव | बदलीनंतर पदस्थापना द्यावयाचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.अ.सं.ठाकरे | रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र (तांत्रिक), मुंबई | रोजगार व स्वयंरोजगार, अमरावती विभाग, अमरावती, (विभागीय मुख्यालय) | रिक्त पदी (स्व-विनंती) शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियममन करण्यासाठीचे अधिनियम, २००५ मधील कलम ४ (५) अन्वये. |

३.	महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ या विभागातील खालील अधिकाऱ्याची प्रशासकीय कारणास्तव त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी बदली करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालयाचे नाव | बदलीनंतर पदस्थापना द्यावयाचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.सु.बं.कदम | विद्यापीठ रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, मुंबई | रोजगार व स्वयंरोजगार, संचालनालय, नवी मुंबई | शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियममन करण्यासाठीचे अधिनियम, २००५ मधील कलम ४ (५) अन्वये प्रशासकीय कारणास्तव |

४. वर नमूद केलेल्या अधिकाऱ्यांच्या बदल्यांची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टिने पुढील सूचनांचे सर्व संबंधितांनी कटाक्षाने पालन करावे.

(१) संबंधित कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली सर्व संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

(२) बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

५. बदली झालेल्या अधिका-यांना कार्यमुक्त केल्याबाबत व ते बदलीच्या विभागात हजर झाल्याबाबतचा अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखांकडून प्राप्त करुन घेऊन आयुक्त, (रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास), रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, नवी मुंबई यांनी या विभागाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

६. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०६२४१३५५२१९९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Devappa Annappa Gawade

Digitally signed by Devappa Annappa Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Devappa Annappa Gawade
Date: 2015.06.24 13:59:59 +05'30'

(दे.आ.गावडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मा.राज्यमंत्री महोदय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) महालेखापाल, (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर.
४) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांचे स्वीय सहायक.
५) आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई.
६) सर्व संबंधित कोषागार अधिकारी.
७) निवड नस्ती.